**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ**
**मधील जिल्हा आरोग्य अधिकारी**
**संवर्गातील बदलीबाबत..**
**डॉ.सुधाकर सोन्याबापू शेळके**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बदली- एसआरव्ही २०१५ /प्र.क्र. ९९ /सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल,१० वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख: २७ फेब्रुवारी, २०१५

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट-अ मधील जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील डॉ. सुधाकर सोन्याबापू शेळके, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांचेविरुध्द लाचलुचपत कायदा १९८८ कलम ७, १२, १३ (१) नुसार गुन्हा क्र. ३०७७/२०१४ दाखल झालेला आहे. डॉ. शेळके यांना झालेली अटक ४८ तासापेक्षा अधिक नसल्याने त्यांना निलंबित न करता, अकार्यकारी पदावर पदस्थापना देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार डॉ. सुधाकर सोन्याबापू शेळके, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांची प्रशासकीय कारणास्तव सहायक जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, बीड या रिक्त पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

२. डॉ.शेळके यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरिता पर्यवेक्षकिय अधिकाऱ्यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे आणि संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांना तसेच संबंधित उपसंचालक व शासनास सादर करावा.

३. सदरहू बदली आदेश महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील कलम ४ (४) (दोन) व ४ (५) मधील तरतुदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०२२६१८००५७३११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशा नुसार व नावाने.

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2015.02.27 14:57:53 +05'30'

**(वि.पुं.घोडके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई

२) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई
३) उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर
४) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर / बीड
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर / बीड
८) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर / बीड
९) डॉ.सुधाकर सोन्याबापू शेळके, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर
१०) मा.प्रधान सचिव(सा.आ.),मंत्रालय,मुंबई यांचे स्वीय सहायक
११) अवर सचिव, सेवा-४ (ब), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती